सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता आदिवासी उपयोजनेंतर्गत आदिवासी क्षेत्रातील राज्य परिवहन महामंडळाच्या बसस्थानकांचे आधुनिकीकरण या योजनेंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत..
(लेखाशिर्ष- ३०५५ ००४३ )

**महाराष्ट्र शासन.**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१७ / प्र.क्र.२६-अ (परिवहन) / कार्या.०६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : - १७ मार्च, २०१७.

**वाचा -**

१) वि. वि,शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.
२) वि. वि,शासन परिपत्रक क्र.संकीर्ण- २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१०.५.२०१६.
३) गृह विभाग, नस्ती क्र.एसटीसी- ०२१७ / प्र. क्र. ३५ / परि-१.

**शासन निर्णय-**

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता आदिवासी उपयोजनेंतर्गत आदिवासी क्षेत्रातील राज्य परिवहन महामंडळाच्या बसस्थानकांचे आधुनिकीकरण या योजनेंतर्गत मागणी क्र.टी-५, ३०५५, मार्ग परिवहन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ००- मार्ग परिवहन, ७९६- जनजाति क्षेत्र उपयोजना, (०१) (०१) आदिवासी क्षेत्रात एस.टी. डेपोचे विकास, बांधकाम, दुरुस्ती ( ३०५५ ००४३ ), ३१- सहायक अनुदाने या बाबीखाली रु.१००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित आहे.

२. आदिवासी क्षेत्रातील राज्य परिवहन महामंडळाच्या बसस्थानकांचे आधुनिकीकरण या योजनेंतर्गत मागणी क्र.टी-५, ३०५५, मार्ग परिवहन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ००- मार्ग परिवहन, ७९६- जनजाति क्षेत्र उपयोजना, (०१) (०१) आदिवासी क्षेत्रात एस.टी. डेपोचे विकास, बांधकाम, दुरुस्ती ( ३०५५ ००४३ ), ३१- सहायक अनुदाने या बाबीखाली अर्थसंकल्पित निधीच्या ८० % च्या मर्यादेत पालघर विभागातील डहाणू बस स्थानकाचे आधुनिकीकरण व डांबरीकरण करणे याकरिता रु. ४०.०० लाख आणि जव्हार बस स्थानकाचे आधुनिकीकरण करणे यासाठी रु. ४०.०० लाख असे एकुण रु. ८०.०० लाख ( अक्षरी रुपये ऐंशी लाख फक्त ) इतका निधी प्रशासकीय विभाग / नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान सचिव ( परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व गृह विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या **वाचा** येथील क्रमांक १ व क्रमांक २ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारांस अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३१७१६३३२१०७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2017.03.17 17:31:00 +05'30'

**भगवान सावंत**
अवर सचिव.

**प्रत,**

१. प्रधान सचिव ( परिवहन ) , गृह विभाग,मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे .
४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू / पालघर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, पालघर.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. कार्यासन क्र. २ व १७, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
९. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.